**कृति आराखडा अंतर्गत सन २००९-१० मध्ये "एकात्मिक कीड व्यवस्थापन प्रयोगशाळांचे बळकटीकरण" ही केंद्र पुरस्कृत योजना राज्यात राबविण्याबाबत.**

**महाराष्ट्र शासन**
**कृषि पशुसंवर्धन, दुगधव्यवसाय विकास व मत्स्यव्यवसाय विभाग**
**शासन निर्णय क्र.राखते ३७०८/प्र.क्र.२४१/१७ अे**
**मंत्रालय विस्तार, मुंबई-४०० ०३२**
**दिनांकः-९ मार्च, २०१०**

वाचा-

१) केद्रिय कृषि मंत्रालयाचे पत्र क्रमांक ६-६/२००९, एमएम दिनांक ३०जून २००९ ,९ जुलै २००९ व २५ जानेवारी,२०१०

२) शासन निर्णय कृषि व पदुम विभाग क्रमांक केंपुयो १००९/प्र.क्र.५४/२अे, दि.१८ जुलै २००९

प्रस्तावना-

. कृति आराखडा अंतर्गत सन २००९-१० या आर्थिक वर्षात एकात्मिक किड व्यवस्थापन प्रयोग शाळांचे बळकटीकरण ही १००टक्के केंद्र पुरस्कृत योजना राज्यात राबविण्यासाठी केंद्र शासनाने संदर्भ क्र. १ मधील पत्रांन्वयें मंजूरी दिलेली आहे. या योजनेकरिता केंद्रशासनाने दिलेली मान्यता विचारात घेऊन सदरचा कार्यक्रम राज्यात राबविण्यासाठी प्रशासकीय तसेच वित्तिय मान्यता देण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

शासन निर्णय

१. कृति आराखडा अंतर्गत सन २००९-१० या वर्षासाठी "एकात्मिक किड व्यवस्थापन प्रयोग शाळांचे बळकटीकरण" ही १०० टक्के केंद्र पुरस्कृत योजना राज्यात राबविण्यासाठी रु.६१.००लाख एवढया कार्यक्रमास प्रशासकीय मान्यता देण्यात येत आहे.

२. "एकात्मिक किड व्यवस्थापन प्रयोग शाळांचे बळकटीकरण" हा कार्यक्रम राज्यात राबविण्यासाठी एकूण रुपये ६१.००लाख (रुपये एकसष्ट लाख ) इतकी रक्कम वितरीत करण्यास शासनाची मान्यता देण्यात येत आहे.

३. या प्रित्यर्थ होणारा खर्च सन २००९-१० करिता मंजूर असलेल्या अनुदानामधून भागविण्यात येवून तो खालील लेखाशिर्षाखाली खर्ची टाकण्यात यावा.

**मागणी क्र.डी -३**

२४०२ - मृद व जलसधारण
१०१ मृद सर्वेक्षण व चाचणी
१०१ (दोन) पंच वार्षिक योजनांतर्गत योजना
(००)(१०) मृद चाचणी व एकात्मिक कीडनाशक प्रयोगशाळांचे बळकटीकरण व मृद आरोग्य पत्रिका (१०० टक्के केंद्र पुरस्कृत योजना) (२४०२ ०७४७)
५२ यंत्रसामग्री व साधनसामग्री

४ वरील निधी खर्च करण्यास संचालक(विस्तार व प्रशिक्षण ) कृषि आयुक्तालय, महाराष्ट्र राज्य, पुणे यांना आहरण व संवितरण अधिकारी म्हणुन घोषित करण्यात येत आहे तसेच मंजूर निधीचे जिल्हानिहाय वितरण करण्यासाठी त्याना प्राधिकृत करण्यात येत आहे. केंद्र शासनाच्या मार्गदर्शक सूचनानुसार या योजनेचा, आर्थिक व भौतिक प्रगती अहवाल ५ तारखेपर्यंत केंद्र शासनाला तसेच राज्य शासनाला सादर होईल याची दक्षता घेण्यात यावी.

५. सदरचा शासन निर्णय, वित्त विभागाच्या अनौपचारिक संदर्भ क्र. ३४ अे /१०/व्यय -१, दि.२४.२.२०१० अन्वये मिळालेल्या मान्यतेनुसार निर्गमित करण्यात आलेला आहे.

६. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या वेबसाईटवर उपलब्ध करण्यात आला असून याचा संगणक संकेतांक क्रमांक २०१००३१०१७०९४४०१ असा आहे.

**महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.**

**(वा.म.तुरुकमाने)**
**उप सचिव,महाराष्ट्र शासन**

प्रति,

आयुक्त कृषि, महाराष्ट्र राज्य, पुणे (५ जादा प्रतीसह )
महालेखापाल, महाराष्ट्र-१/२ (लेखा परिक्षा / लेखा व अनुज्ञेयता), मुंबई/ नागपूर
संचालक (विस्तार व प्रशिक्षण), कृषि आयुक्तालय, महाराष्ट्र राज्य, पुणे
सर्व संचालक/सहसंचालक, कृषि आयुक्तालय, महाराष्ट्र राज्य, पुणे
सर्व विभागीय कृषि सहसंचालक
सर्व जिल्हा अधिक्षक कृषि अधिकारी
सर्व जिल्हा कोषागार अधिकारी
ग्रंथपाल, महाराष्ट्र विधानमंडळ सचिवालय, ग्रंथालय, विधानभवन, मुंबई
वित्त विभाग (व्यय-१) ( अर्थ १३ )
कार्यासन २-अे, कृषि व पदुम विभाग, मंत्रालय, मुंबई /निवड नस्ती